*अंशतः राज्य शासनाकडे व अंशतः केंद्र शासनाकडे/स्वायत्त संस्थांकडे सेवा केलेल्या शासकीय कर्मचाऱ्याच्या मृत्युनंतर त्याच्या कुटुंबास एकच कुटुंब निवृत्तिवेतन मंजूर करणेबाबत*

# महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

निर्णय, क्रमांकः सेनिवे-१०९८/१९/सेवा-४,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक १२ सप्टेंबर २००१.

## निर्णय

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ च्या नियम ६७ (आय) (दोन) च्या तरतुदीनुसार , कुटुंब निवृत्तिवेतन, केवळ एकाच ठिकाणाहून म्हणजे एकतर राज्य शासनाकडून किंवा या नियमांमध्ये निर्देशिलेल्या संघटनेकडे कुटुंब निवृत्तिवेतन देण्यासंबंधी अशाच प्रकारची योजना असेल तर त्या संघटनेकडून, अनुज्ञेय ठरेल. त्यानुसार लाभाधिकाऱ्याला या दोन योजनांपैकी एक योजना निवडण्याचा विकल्प दिला जातो. त्याचप्रमाणे उपरोल्लिखित नियमावलीच्या नियम ११६ (१८) मध्ये असे विहित करण्यात आले आहे की, जो सैनिक निवृत्तिवेतनधारक पुनर्नियुक्तीच्या काळात नागरी पद अस्थाई नात्याने धारण करित असताना मृत्यु पावला असेल त्याच्या कुटुंबाला, या नियमानुसार अनुज्ञेय असणारे कुटुंब निवृत्तिवेतन किंवा सैनिकी सेवेतून निवृत्त किंवा कार्यमुक्त होतेवेळी सेना अनुदेशान्वये मंजूर केलेले कुटुंब निवृत्तिवेतन यापैकी, एकाची निवड करण्यास परवानगी देण्यात येईल. या तरतूदी असे स्पष्टपणे दर्शवितात की, प्रचलित नियमानुसार एकच व्यक्ती दोन ठिकाणाहून कुटुंब निवृत्तिवेतन मिळण्यास पात्र ठरत नाही. तथापि एका प्रकरणी शासनाच्या आता असे निदर्शनास आणण्यात आले आहे की, मृत्यु पावलेल्या शासकीय कर्मचाऱ्याच्या कुटुंबातील सदस्यास, केंद्र शासनाकडून तसेच राज्य शासनाकडून कुटुंब निवृत्तिवेतने प्राप्त होत आहेत. अशाप्रकारचे कुटुंब निवृत्तिवेतनाचे दुहेरी प्रदान नियमोचित नाही. प्रचलित नियमांच्या तरतुदींमध्ये काही त्रुटी असल्याच्या परिणामी निवृत्तिवेतन संवितरण प्राधिकाऱ्यांना अशाप्रकारच्या दुहेरी प्रदानांवर नियंत्रण ठेवणे कठीण जात आहे.

२. नियमांमधील वरील त्रुटी दूर करण्याच्यादृष्टिने, शासन आता खालीलप्रमाणे कार्यपध्दती विहित करीत आहे:-

(अ) केंद्र शासन किंवा अन्य कोणतेही शासन अथवा स्वायत्त संस्था किंवा उपरोल्लेखित नियमांमध्ये निर्देशिलेली अन्य कोणतीही संघटना यांच्या सेवेतून सेवानिवृत्त झालेला कर्मचारी जर कालांतराने राज्य शासनाच्या सेवेत पुनर्नियुक्त झालेला असेल तर त्याचे निवृत्तिवेतनविषयक कागदपत्र संबंधित महालेखापालांकडे पाठवितांना विभाग/कार्यालय प्रमुखांनी त्या निवृत्तिवेतनविषयक कागदपत्रांवर,

'संबंधित शासकीय कर्मचाऱ्याच्या मृत्युनंतर त्याच्या कुटुंबास राज्य शासनाच्या नियमानुसार अनुज्ञेय ठरणारे कुटुंब निवृत्तिवेतन किंवा केंद्र शासन/संबंधित संघटना यांच्या नियमानुसार अनुज्ञेय ठरणारे कुटुंब निवृत्तिवेतन यापैकी एकाची निवड करण्यासाठी महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ च्या, यथास्थिती, नियम ६७ किंवा नियम ११६ च्या तरतुदीनुसार विकल्प द्यावा लागेल. आवश्यक तो विकल्प प्राप्त झाल्यानंतर निवृत्तिवेतनधारकाच्या कुटुंबातील संबंधित पात्र सदस्यास कुटुंब निवृत्तिवेतन प्रदान करण्याची कार्यवाही निवृत्तिवेतन संवितरण प्राधिकाऱ्याने करावी', असे स्पष्टपणे निर्देशित करुन उपरोल्लिखित निवृत्तिवेतनविषयक कागदपत्रे संबंधित महालेखापालांकडे पाठवावीत.

(ब) संबंधित महालेखापालांनी निवृत्तिवेतन प्रदान आदेश निर्गमित करताना वरील (अधोरेखित) अभिप्राय सदरहू निवृत्तिवेतन प्रदान आदेशांवर पुन्हा नमूद करावेत.

(क) निवृत्तिवेतन संवितरण प्राधिकाऱ्यांनी कुटुंब निवृत्तिवेतन प्रदान करण्यापूर्वी वर नमूद केलेल्या सूचनांचे पालन केले जाईल याची दक्षता घ्यावी.

३. या आदेशांची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**वसन्त वा. चौधरी**
**शासनाचे उप सचिव.**

प्रति

भारत सरकारचे सचिव,वित्त मंत्रालय, नवी दिल्ली,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई (१२५ प्रती),
महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर (१२५ प्रती),
महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई (५ प्रती),
महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर (५ प्रती),
मुख्य लेखा अधिकारी, बी ब्लॉक, दिल्ली प्रशासन, विकास भवन, नवी दिल्ली (५ प्रती),
नियंत्रक, लेखा, परराष्ट्र मंत्रालय, नवी दिल्ली (१० प्रती),
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई (५ प्रती),
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (२५ प्रती),
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई (१० प्रती),
उप-मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती (प्रत्येकी १० प्रती),
वरिष्ट कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक (प्रत्येकी १५ प्रती),
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (प्रत्येकी १० प्रती),
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,

H-663(13,000+50-9-01)1a

उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,
*प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
*प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण कुटीर क्र.३ व ४, अधिदान व लेखा कार्यालय आवार, मंत्रालयासमोर, मुंबई,
मंत्रालयातील सर्व विभाग,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
सर्व विभागीय आयुक्त (प्रत्येकी ५ प्रती),
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),
सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष (प्रत्येकी ५ प्रती),
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती),
तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई (५ प्रती),
संचालक, महानगरपालिका प्रशासन, मुंबई (५ प्रती),
सर्व विभागीय शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),
सर्व विभागीय तंत्र शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),
शिक्षण निरीक्षक, बृहन्मुंबई, दक्षिण/उत्तर/पश्चिम,
सर्व प्रशासन अधिकारी, नगरपालिका शिक्षण मंडळ (प्रत्येकी ५ प्रती),
सर्व महानगरपालिका व नगरपरिषदा, महाराष्ट्र राज्य (प्रत्येकी ५ प्रती),
सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण) (प्रत्येकी ५ प्रती),
कुल सचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर (१० प्रती),
कुल सचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ , परभणी (१० प्रती),
कुल सचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला (१० प्रती),
कुल सचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी (१० प्रती),
ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई (१२ प्रती),
शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती),
उच्च व तंत्र शिक्षण आणि सेवायोजन विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती),
कृषि व पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्य व्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई (१० प्रती),
संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग,मंत्रालय, मुंबई (५०० प्रती),
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, कार्यासन सेवा-४.

*पत्राद्वारे.

***Grant of only one family pension to the family of a Government servant, who had served partly under the State Government and partly under the Central Government/Organisation.***

**GOVERNMENT OF MAHARASHTRA**
**Finance Department**
Resolution No. PEN-1098/19/SER-4,
Mantralaya, Mumbai-400 032, dated 12 September 2001.

## ***RESOLUTION***

In accordance with the provisions of Rule 67 (i)(ii) of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982, family pension is admissible from only one source, i.e., either from the State Government or the organisation referred to in the rule in case such organisation has similar scheme for payment of family pension. Accordingly, the beneficiary is given option to choose either of the two schemes. Similarly, in Rule 116 (18) of the aforesaid Rules, it has been provided that in the case of a military pensioner who dies while holding a civil post in a temporary capacity in the course of re-employment, his family may be allowed to opt for the family pension admissible under this rule or the family pension authorised at the time of his retirement or discharge from the military under army instructions. These provisions clearly indicate that one person cannot be entitled to get family pension from two sources. However, a case has now been brought to the notice of the Government in which the family member of a deceased Government servant is in receipt of family pension from the Central Government as well as the State Government. Such double payment of family pension is not consistent with the existing rules. Due to some discrepancies in the rules it has become difficult for the Pension Disbursing Authority to keep control on such double payment.

2. To do away with such discrepancies, Government is now pleased to lay down the following procedure:

(a) While forwarding pension papers to the Accountant General concerned in respect of a Government servant who had retired from service under the Central Government or any other Government or Autonomous Body or any other organisation referred to in the aforesaid rules and was re-appointed under the State Government, the Head of Office/Department should specify, on the said pension papers, that "After the death of the said Government servant his family should opt for the family pension admissible under the State Government rules or the family pension admissible under the rules of the Central Government/ organisation concerned, as per the provisions of Rule 67 or Rule 116, as the case may be, of Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982. After obtaining the requisite option, Pension Disbursing Authority may sanction family pension to the eligible family member concerned of the pensioner."

(b) At the time of issuing Pension Payment Order (PPO) the Accountant General concerned should reiterate the above (underlined) remarks on the said PPO.

(c) Pension Disbursing Authorities should ensure that the abovementioned instructions are complied with before payment of family pension.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

**VASANT W.CHAUDHARI**
Deputy Secretary to Government.

* * * * *

H-663(13,000+50-9-01)2a.